**भुसावळ शहरातून जाणारा जुना राष्ट्रीय महामार्ग क्र. ६, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मार्ग (जुना आर.पी.डी. रोड) रेल्वे प्रशासन, भुसावळ यांचेकडे हस्तांतरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.११/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २२ जुलै, २०२०.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा.क्र.का-५/साबांप्रादेविना/प्रआ/प्रक्र.२२५/रस्ते हस्तांतरण/६२१/२०२०, दि.१३.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे मालकीचा डॉ. बाबासाहेब आंबेडकर मार्ग (जुना आर.पी.डी.रोड) रेल्वे प्रशासनाकडे हस्तांतरित करणेबाबत विनंती केली आहे. तसेच उपरोक्त रस्ता रेल्वे प्रशासनाकडे हस्तांतरित करण्यास नगरपरिषद, भूसावळ यांनी मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने सदर रस्ता रेल्वे प्रशासनाकडे हस्तांतरित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

भुसावळ शहरातून जाणा-या जुना राष्ट्रीय महामार्ग क्र.६ (जुना आर.पी.डी. रोड) हा ५.८०० कि.मी. लांबीचा रस्ता खालील अटींच्या अधीन राहून रेल्वे प्रशासन, भुसावळ यांचेकडे हस्तांतरित करण्यात येत आहे.

१. सदर रस्त्यालगत कंडारी हे गाव असून सदर गावासाठी हाच एकमेव रस्ता रहदारी करीता उपलब्ध आहे. सबब कंडारी गावाच्या नागरिकांच्या रहदारीस बाधा होणार नाही याची दक्षता रेल्वे प्रशासन, भुसावळ यांनी घ्यावी.
२. सदर रस्त्याची देखभाल व दुरुस्ती रेल्वे प्रशासनामार्फत करण्यात येईल. सदर रस्त्याकरीता राज्य शासनाकडून कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही किंवा रेल्वे प्रशासनाला त्याबाबत राज्य शासनाकडे मागणी करता येणार नाही.
३. सदर रस्त्यावरील सर्व न्यायालयीन प्रकरणे रेल्वे प्रशासन, भुसावळ यांचेकडून हाताळण्यात येतील.
४. सदर रस्त्यावर कोणत्याही प्रकारचे अतिक्रमण होणार नाही याची जबाबदारी रेल्वे प्रशासन, भुसावळ यांची राहील.
५. सदर रस्त्याचा मालकी हक्क सार्वजनिक बांधकाम विभागाकडे राहील.
६. भविष्यात आवश्यकतेनुसार सदर रस्ता पुन्हा सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ताब्यात द्यावयाचा निर्णय झाल्यास सदर रस्ता सुस्थितीत करुन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ताब्यात देण्याची जबाबदारी रेल्वे प्रशासन, भुसावळ यांची राहिल व याबाबत सदर रस्त्यावर कोणतीही कामे केल्याबाबतच्या निधीची मागणी / दावे / खर्चाची मागणी इत्यादी मान्य होणार नाही.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००७२२१३१०५६७७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.07.22 13:16:49 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय रेल्वे व्यवस्थापक, भुसावळ.

२) मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) विभागीय आयुक्त, नाशिक.

४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

५) जिल्हाधिकारी, जळगांव.

६) मुख्याधिकारी, नगरपरिषद भुसावळ.

७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, जळगांव.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

९) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

११) निवडनस्ती.